नाशिक रोड मध्यवर्ती कारागृहाच्या धर्तीवर राज्यातील इतर आठ कारागृहांमधील बंद्यांच्या कल्याणासाठी विपश्यना शिबीर आयोजित करण्यास मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय, क्रमांक-एमआयएस-०१९८/१०३१/प्रोआर-२८/जेआरएस-२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक :- १२ फेब्रुवारी १९९८.

वाचा :- कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्रमांक-विपश्यना/शिबीर/१९९७/क-५(३) पुणे-१, दिनांक ३१.३.९७ चे पत्र.

या कार्यालयाचे दिनांक २४.१.१९९७ चे प्रस्तावानुसार येरवडा मध्यवर्ती कारागृहातील बंद्यांकरिता विपश्यना शिबीर दि. २६.२.१९९७ ते ५.३.१९९७ या कालावधीत आयोजित करण्यात आले होते. त्या कालावधीत १०५ कैद्यांनी भाग घेतला. त्याप्रमाणे ६.३.९७ नंतरच्या शिबीरात २८ स्त्री बंद्यांनी भाग घेऊन शिबीर यशस्वीरित्या पार पाडले. यापूर्वीही नाशिकरोड मध्यवर्ती कारागृहात एकूण १४ शिबीरांत एकूण ७५०/८०० बंद्यांनी भाग घेऊन शिबीर यशस्वीरित्या पार केले आहे.

सदरच्या शिबीराचे अवलोकनाच्या आधारे असे निदर्शनास आले आहे की, बंद्यांचे मनावर दूरगामी परिणाम घडविण्यास बहुमोल मदत झाली आहे. शिबीरातील सहभागामुळे असे आढळून आलेले आहे की, बंदी आपल्या कामात दक्ष राहू लागले असून परिस्थितीशी सुयोग्य समायोजन करण्याकडे वृत्ती जोपासली जाऊ लागली आहे. त्याचप्रमाणे बंद्यांमध्ये एकमेकांविषयी बंधुत्वाची भावना निर्माण झाली असून त्यास नेमून दिलेल्या कामास मनोभावे लक्ष घालून संस्थेचे उत्पादन वाढविण्यास मदत करू लागले आहेत.

कैद्यांचे पुनर्वसनासाठी शासनाच्या कल्याणकारी योजना म्हणून विपश्यना शिबीर हा एक भाग धरून राज्यातील आणखी कारागृहातील बंद्यांना लाभ व्हावा, यासाठी प्रायोगिक तत्वावर खालील कारागृहात विपश्यना शिबीर सुरु करण्यास परवानगी द्यावी ही विनंती.

१) नागपूर मध्यवर्ती कारागृह.
२) औरंगाबाद मध्यवर्ती कारागृह.
३) कोल्हापूर मध्यवर्ती कारागृह.
४) अमरावती मध्यवर्ती कारागृह.
५) ठाणे मध्यवर्ती कारागृह.
६) पुणे जिल्हा कारागृह (गोगेड अवस्थेतील किशोरांसाठी)

७] खुले जिल्हा कारागृह, पैठण.

८] अकोला जिल्हा कारागृह.

विपश्यना शिबीराचे आयोजनासाठी आवश्यक असलेले साहित्य - जसे, रंगीत टि.व्ही.-१ [एक] नग, [२] व्हीसीपी-एक [१] नग [३] अॅम्पोफायर स्पिकर,-१, २ माईक, लागणार आहे. त्याकरिता प्रत्येक कारागृहाकरिता अंदाजित रु.३५,०००/-[रु.पस्तीस हजार] खर्च येतो. वरील खर्च हा "२०५६-तुरुंग-इतर खर्चातील बंदी सुखसोई निधी [ Amenties to prisoners ] या शिर्षाखालील अनुदानातून खर्च भागविण्यात येईल.

शासन निर्णय:- नाशिक रोड मध्यवर्ती कारागृहाच्या धर्तीवर वर नमूद केलेल्या राज्यातील आठ कारागृहात "विपश्यना ध्यान शिबीर" आयोजित करण्यास व धम्म हॉलसाठी आवश्यक असणा-या टि.व्ही. व्ही.सी.पी., अॅम्प्लीफायर स्पीकर, माईक इत्यादी वस्तू खरेदी करण्यास लागणा-या वर नमूद केलेल्या प्रत्येक कारागृहाकरिता रु.३५,००० [रुपये पस्तीस हजार] प्रमाणे आठ कारागृहांकरिता रु.२,८०,०००/- [दोन लाख ऐंशी हजार फक्त] एवढ्या खर्चास मंजुरी देण्यात येत आहे. ~~मार्च~~ सन १९९७-९८ च्या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून [redacted] भागविण्यात यावा.

२. वरीलप्रमाणे रु.२,८०,०००/- [दोन लाख ऐंशी हजार फक्त] एवढा येणारा खर्च "२०५६-तुरुंग-१०१-तुरुंग-१०१ [एक] मध्यवर्ती तुरुंग-२० इतर खर्च" या शीर्षाखाली टाकण्यात यावा. व त्या सालातील मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा

३. हा निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.सीआर-७४१/९७/व्यय-८, दिनांक ५.२.९८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[signature]

[ ता.स. नाईक ]

कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

अधिक्षक, नागपूर मध्यवर्ती कारागृह, नागपूर.

अधिक्षक, औरंगाबाद मध्यवर्ती कारागृह, औरंगाबाद.

अधिक्षक, कोल्हापूर मध्यवर्ती कारागृह, कोल्हापूर.

अधिक्षक, अमरावती मध्यवर्ती कारागृह, अमरावती.

अधिक्षक, ठाणे मध्यवर्ती कारागृह, ठाणे.

अधिक्षक, धुळे जिल्हा कारागृह, धुळे.

अधिक्षक, खुले जिल्हा कारागृह, पैठण.

अधिक्षक, अकोला जिल्हा कारागृह, अकोला.

महालेखापाल-१/२ [लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा] मुंबई/नागपूर.

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

निवासी लेखा अधिकारी, मुंबई.

जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/औरंगाबाद/कोल्हापूर/अमरावती/ठाणे/धुळे/अकोला.

महासंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा माळा, मुंबई.

वित्त विभाग [व्यय-८]

गृह विभाग [बीपुडी-१]